पोलीस उपनिरीक्षक (मुख्य) परीक्षा - २०१२



परीक्षा दि. २२-६-१२ 2012

पेपर-१

CODE : **COO**

प्रश्नपुस्तिका क्रमांक

**BOOKLET NO.**

## प्रश्नपुस्तिका
## मराठी व इंग्रजी

**वेळ : 2 (दोन) तास**

**एकूण प्रश्न : 200**

**एकूण गुण : 200**

# सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 200 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ↑ केंद्राची संकेताक्षरे | | | | | | | ↑ शेवटचा अंक |

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी, **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरूद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

**पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये**

1. पुढील 'आज्ञार्थ' क्रियापदावरून कोणत्या गोष्टीचा बोध होतो ?
'तेवढी खिडकी लाव पाहू ...'
(1) सौम्य आज्ञा (2) प्रार्थना (3) आशीर्वाद (4) अनुमोदन प्रश्न

2. 'हा शर्ट मी अंदाजानं आणलाय्, पण सुदैवानं तुला <u>अगदी छान बसतो आहे</u>' अधोरेखित शब्दाचा वाक्यप्रचार ओळखा –
(1) अंगाला होणे (2) अंगी लागणे (3) अंगात मुरणे (4) अंगावर येणे

3. <u>आम्हां</u> मुलांना कोण विचारतो ?
वरील वाक्यातील अधोरेखित शब्दाची अचूक शब्दजात सांगा ?
(1) दर्शक विशेषण (2) संबंधी विशेषण
(3) सार्वनामिक विशेषण (4) प्रश्नार्थक विशेषण

4. 'तो घरी जातो' या वाक्यातील प्रयोग कोणता ?
(1) सकर्मक कर्तरी (2) अकर्मक कर्तरी (3) कर्मणी (4) भावे

5. 'अब्द' या शब्दाचा पर्यायी शब्द ओळखा :
(1) लक्ष (2) मेघ (3) शंभर (4) अक्ष

6. 'हे कोणीही कबूल करील.' या वाक्यातील उद्देश्य कोणते ?
(1) हे (2) कोणीही (3) कबूल (4) करील

7. खालीलपैकी योग्य 'उद्गारवाचक' वाक्य ओळखा.
(1) केवढा मोठा साप आहे (2) साप खूप मोठा आहे का ?
(3) केवढा मोठ्ठा साप आहे नाही ! (4) अरे बापरे ! केवढा मोठ्ठा साप... !

8. गाळलेल्या जागी योग्य शब्द लिहा.
राजीव, पंकज, अंबुज, ________ .
(1) पीयूष (2) सरोज (3) सुधा (4) सारस

9. 'पोपट पेरू खातो', या वाक्यातील कर्म कोणत्या विभक्तीत आहे.
(1) तृतीयान्त (2) चतुर्थ्यन्त (3) द्वितीयान्त (4) प्रथमान्त

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

10. कर्तव्यदक्ष शब्दाचा समानार्थी शब्द कोणता ?

(1) कर्तव्य परायण (2) कर्तव्यतत्पर (3) कर्तव्याला जागणारा (4) वरील तिन्ही

11. खालील सामासिक शब्दाचा प्रकार ओळखा.

महादेव__________ .

(1) कर्मधारय (2) द्वंद्व (3) द्विगू (4) अव्ययीभाव

12. पुढील पर्यायातून 'अनेकार्थी शब्दगट' शोधा.

हवा –

(1) वात, संधिवात (2) वायू, पाहिजे (3) स्नायु, आमवात (4) वारा, हवाई

13. 'स्वकपोलकल्पित' म्हणजे काय ?

(1) स्वत:च्या कल्पनेने रचलेले (2) दुसऱ्याने सांगितलेले

(3) एखाद्याची आठवण करून देणारे (4) एकाचे सांगणे ऐकून दुसऱ्याने लिहिलेले

14. 'वर-पिता मुलाच्या लग्नात तोऱ्यात वावरत असतो.'

अधोरेखित शब्दाची शब्दजात सांगा.

(1) नाम (2) सर्वनाम (3) विशेषण (4) क्रियापद

15. 'रामाकडून रावण मारला गेला' या प्रयोगाचे नाव सांगा ?

(1) कर्तरी प्रयोग (2) कर्मणी प्रयोग (3) भावे प्रयोग (4) संकीर्ण प्रयोग

16. पुढीलपैकी कोणता शब्द 'समुदायवाचक' आहे.

(1) कळप (2) घर (3) लोखंड (4) पाणी

17. अचूक अर्थाचा 'समोच्चारी' शब्द शोधा.

भाव –

(1) दर, सात्विक भाव (2) धडपड, मोजमाप (3) मनन, चिंतन (4) मनु, मण

18. खालीलपैकी 'शुद्ध शब्दयोगी' अव्यय ओळखा –

(1) कुत्रा सुद्धा (2) घरच्या बाहेर (3) गावोगावी (4) मांडवाखाली

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**19.** पुढील पर्यायातून 'अचूक' शब्द निवडा :
अंशाभ्यस्त ________.
(1) लाडीगोडी (2) छी छी (3) खुशी (4) लाल लाल

---

**20.** माझ्या नणंदेच्या सासूने तिला उभ्या वर्षात एकदाही माहेरी पाठविली नाही' या वाक्यातील विधेय ओळखा -
(1) नणंद (2) उभ्या वर्षात एकदाही माहेरी
(3) पाठविली नाही (4) सासूने

---

**21.** 'सहलीस जाताना कात्रजजवळ उजाडले.' प्रयोग ओळखा.
(1) कर्तरी प्रयोग (2) शक्य कर्मणी प्रयोग
(3) नवीन कर्मणी प्रयोग (4) भावे प्रयोग

---

**22.** समर्पक शब्दाच्या साह्याने पुढील वाक्य पूर्ण करा.
'अन्यायाचा ________ करता करता तो अमर झाला'.
(1) अंगीकार (2) स्वीकार (3) तिरस्कार (4) प्रतिकार

---

**23.** 'तुम्ही कामे केलीत', हे वाक्य कोणत्या प्रयोग प्रकारातील आहे ?
(1) कर्तृ-कर्मसंकर (2) कर्मकर्तरी (3) कर्तृ-भावसंकर (4) कर्म-भावसंकर

---

**24.** प्रचलित शुद्धलेखनानुसार चुकीचा शब्द कोणता ?
(1) लघुकथा (2) गतिमान (3) वधुपरिक्षा (4) महीपाल

---

**25.** 'अशा प्रकारचे अनेक विचार आकाशातील सृष्टीचे सौंदर्य पाहून त्याचे मनन करणाऱ्याच्या मनात येतील.' या वाक्यातील 'विधेयविस्तार' ओळखा.
(1) विचार
(2) अशा प्रकारचे अनेक
(3) येतील
(4) आकाशातील सृष्टीचे सौंदर्य पाहून त्याचे मनन करणाऱ्याच्या मनात

---

**26.** 'भित्यापाठी ब्रह्मराक्षस' या म्हणीचा योग्य अर्थ शोधा.
(1) भीती न वाटणे (2) घाबरणे
(3) भित्र्या माणसावर संकटे कोसळणे (4) जीव पट्दिशी जाणे

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

27. शुद्ध शब्दाचा पर्याय निवडा.
(1) महात्म्य (2) माहात्म्य (3) माहात्म (4) महात्म

28. त्याचा मोठा भाऊ गावी गेला. या वाक्याचा प्रकार ओळखा.
(1) विधानार्थी (2) प्रश्नार्थी (3) उद्गारार्थी (4) होकारार्थी

29. 'दुष्काळ' या शब्दाचा विरुद्धार्थी शब्द कोणता ?
(1) नापीक (2) सुकाळ (3) अवर्षण (4) कोरडा

30. समानार्थी नसलेला शब्द सांगा.
(1) थाट (2) वाट (3) पथ (4) मार्ग

31. कोणताही प्रत्यय न लागलेल्या पदाची विभक्ती कोणती मानतात ?
(1) षष्टी (2) संबोधन (3) प्रथमा (4) तृतीया

32. पुढीलपैकी तद्भव शब्द कोणता ?
(1) दगड (2) दूध (3) हाड (4) ढेकूण

33. 'विद्यार्थ्याला' या शब्दातील सामान्यरुप कोणते ?
(1) विद्यार्थी (2) विध + अर्थी (3) विद्या + अर्थी (4) विद्यार्थ्या

34. 'मांजराकडून उंदीर मारला गेला,' या वाक्यातील कर्ता कसा आहे ?
(1) चतुर्थ्यन्त (2) शब्दयोगी अव्ययान्त (3) सविकरणी तृतीयान्त (4) प्रथमान्त

35. पुढील पर्यायातून 'अचूक' शब्द निवडा :
उपसर्गघटित __________.
(1) प्रयोग (2) खाणावळ (3) गटपट (4) भाजीपाला

36. पुढील वाक्याचा प्रकार ओळखा –
'मुलांनो, सर्वजण रांगेत उभे राहा.'
(1) आज्ञार्थ (2) स्वार्थ (3) विध्यर्थ (4) संकेतार्थ

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

37. 'तो नेहमीच उशिरा येत असतो.' वाक्यातील काळ ओळखा.
(1) साधा वर्तमानकाळ (2) रीती भविष्यकाळ (3) रीती भूतकाळ (4) रीती वर्तमानकाळ

38. खालीलपैकी समाहार द्वंद्व समासाचे उदाहरण कोणते.
(1) नास्तिक (2) नवरात्र (3) मीठभाकर (4) पीतांबर

39. वाक्याच्या शेवटी तपशील द्यावयाचा असल्यास कोणते विरामचिन्ह वापरतात ?
(1) अर्धविराम (2) स्वल्पविराम (3) संयोगचिन्ह (4) अपूर्णविराम

40. 'मंदिर' हा कोणत्या प्रकारातील शब्द आहे ?
(1) तद्‌भव (2) तत्सम (3) देशी (4) परभाषीय

41. 'सुगम' या शब्दाचा विरुद्धार्थी शब्द कोणता ?
(1) सोपा (2) दुर्गम (3) सुलभ (4) सहज

42. 'हाजीर तो वजीर' या म्हणीचे समर्पक उदाहरण कोणते ?
(1) जो कष्ट करतो त्याला यश मिळते, असे नाही.
(2) अभ्यास केला की उत्तीर्ण होणारच असे नाही.
(3) जो वेळेला हजर असतो त्याचा फायदा होतो.
(4) ज्याला पोहता येते तो पोहणारच् असे नाही.

43. माणसाने स्वार्थ व __________ चा विचार करावा. स्वार्थ शब्दाचा विरुद्धार्थी शब्द कोणता ?
(1) आप्पलपोटी (2) प्रपंच (3) परमार्थ (4) पोटार्थ

44. पुढील वाक्यातील अधोरेखित शब्दाची शब्दजात सांगा.
आमच्या गावात बरेच पाटील आहेत.
(1) भाववाचक नाम (2) सामान्य नाम (3) विशेषण (4) विशेषनाम

45. माझ्याकडून कॉफी घेतली गेली. प्रयोग ओळखा.
(1) कर्मणी प्रयोग (2) भावे प्रयोग (3) कर्तरी प्रयोग (4) संकीर्ण प्रयोग

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

46. 'दुहेरी' हा शब्द संख्याविशेषणाच्या कोणत्या पोटप्रकारातील आहे ?

(1) क्रमवाचक (2) पृथक्त्ववाचक (3) आवृत्तिवाचक (4) गणनावाचक

47. विधानार्थी करा –

'या तान्ह्या मुलाची काळजी करायला नको ?'

(1) या तान्ह्या मुलाची काळजी का, करावी ? (2) या तान्ह्या मुलाची काळजी कोणीही करते का ?

(3) या तान्ह्या मुलाची काळजी करायला हवी. (4) या तान्ह्या मुलाची काळजी करावी का ?

48. अरबी परभाषेतून पुढीलपैकी कोणता शब्द मराठीत आला ?

(1) अर्ज (2) भाकरी (3) सामना (4) बटाटा

49. गुजराती भाषेतून मराठीत आलेला शब्द कोणता ?

(1) बस (2) गाजर (3) सामना (4) रिकामटेकडा

50. 'केवढी उंच ही इमारत !' या वाक्याचे विधानार्थी वाक्यात परिवर्तन करा ?

(1) ही इमारत उंच असावी का ? (2) ही इमारत उंच आहे का ?

(3) ही इमारत किती उंच आहे ? (4) ही इमारत खूप उंच आहे.

51. खालील वाक्य कोणत्या वाक्य प्रकाराचे आहे ?

'आम्ही आमुच्या गावी जायचे का ?

(1) मिश्र वाक्य (2) संयुक्त वाक्य (3) केवल वाक्य (4) नकारार्थी वाक्य

52. पुढील चार पर्यायातून अचूक अर्थाचा शब्द शोधून काढा :

राम –

(1) सामर्थ्य, रुपया (2) मृत्यू, पैसा (3) शक्ती, मरण (4) द्रव्य, सीता

53. 'कोणत्याही गोष्टीचा अतिरेक हा वाईट असतो' या वाक्यासाठी योग्य म्हण निवडा.

(1) अति तिथे माती (2) करावे तसे भरावे

(3) दाम करी काम (4) अंथरूण पाहून पाय पसरावे

54. 'कटी' या शब्दाचा अर्थ ________.

(1) झोपडी (2) अबोला धरणे (3) कंबर (4) कापणे

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

55. खालील शब्दाचा शब्दयोगी–अव्यय प्रकार सांगा –
'प्रीत्यर्थ'
(1) तुलना वाचक (2) हेतुवाचक (3) व्यतिरेकवाचक (4) स्थलवाचक

56. 'देवाने' या शब्दात कोणत्या विभक्तीचा प्रत्यय आलेला आहे ?
(1) प्रथमा (2) द्वितीया (3) तृतीया (4) चतुर्थी

57. मिश्र वाक्य ओळखा.
(1) शिपाई लढता लढता मेला.
(2) राजा पळून जाईल किंवा शरण येईल.
(3) बाबा म्हणाले की न्यूयॉर्क हे एक मोठे शहर आहे.
(4) तो झाडावर चढत असताना पाय घसरून पडला.

58. उद्देश्य व विधेय हे __________ चे घटक होत.
वरील रिकाम्या जागेत अचूक पर्याय भरा.
(1) वाक्या (2) अर्थप्रकारा (3) अर्था (4) वाक्य प्रयोगा

59. पुढील पर्यायातून 'अचूक' शब्द निवडा :
मराठी प्रत्यय व त्यापासून बनविलेला धातुसाधित.
(1) चराई (2) मंदिर (3) जल (4) अत्तर

60. चोराच्या मनात __________ .
रिकाम्या जागी अचूक पर्याय भरा.
(1) चांदणे (2) पोलीस (3) शिपाई (4) सोने नाणे

61. 'रक्षक, वंदना, श्रवणीय, रसिक ही कोणते प्रत्यय लागून बनलेली धातुसाधिते आहेत ?
(1) मराठी प्रत्यय व त्यापासून बनलेली (2) संस्कृत प्रत्यय व त्यापासून बनलेली
(3) फारसी प्रत्यय व त्यापासून बनलेली (4) गुजराती प्रत्यय व त्यापासून बनलेली

62. खालीलपैकी 'देव' या नामाचे अनेक वचन कोणते ?
(1) देवा (2) देवाला (3) देव (4) देवी

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

63. 'अंगी ताठा भरणे' या वाक्यप्रचाराचा अचूक अर्थ लिहा -
(1) रोडावणे (2) शिष्टाई करणे (3) राग येणे (4) मगरूरी करणे

64. पुढीलपैकी वेगळी जोडी ओळखा.
(1) लोटा-लोटी (2) दांडा-दांडी (3) बोकड-शेळी (4) आरसा-आरशी

65. पुढील वाक्यात योग्य 'केवल प्रयोगी अव्यय' लिहा -
.....! किती उंच मनोरा हा..!
(1) अबब! (2) अरेरे! (3) अयाई! (4) इश्श!

66. खालीलपैकी शुद्ध शब्द कोणता?
(1) निलिमा (2) नीलिमा (3) निलीमा (4) नीलीमा

67. 'कवी' या शब्दाचे अनेकवचन__________ .
(1) महाकवी (2) कविवर्य (3) कवयित्री (4) कवी

68. 'जी माणसे गर्विष्ठ असतात त्यांच्यावर अपमानित होण्याची पाळी येते,' या अर्थाची योग्य म्हण निवडा.
(1) नावडतीचे मीठ अळणी (2) शहाण्याला शब्दाचा मार
(3) हसतील त्याचे दात दिसतील (4) गर्वाचे घर खाली

69. 'तुझ्याविषयी मला अनादर नाही' या वाक्याचे 'होकारार्थी' रूप तयार करा – अचूक पर्याय सांगा.
(1) तुझ्याविषयी मला 'आदर' वाटतो. (2) तुझ्याविषयी मला 'उदारत्व' वाटते.
(3) तुझ्याविषयी मला 'औदार्य' वाटते. (4) तुझ्याविषयी मला 'आधार' वाटतो.

70. शिपायाकडून चोर पकडला गेला.
या वाक्यातील प्रयोग -
(1) कर्तरी (2) सकर्मक कर्तरी (3) नवीन कर्मणी (4) भावे

71. पुढीलपैकी कोणता शब्द विसंगत आहे?
(1) तडित (2) विद्युत (3) सौदामिनी (4) आकाश

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

72. 'अक्का' हा शब्द कोणत्या भाषेतून आलेला आहे?
(1) तेलगू (2) मराठी (3) कानडी (4) तामिळ

73. संबोधन दर्शविताना कोणते विरामचिन्ह वापराल?
(1) स्वल्पविराम (2) अर्धविराम (3) संयोगचिन्ह (4) अपूर्णविराम

74. खालील म्हणीच्या रिकाम्या जागी योग्य पर्याय भरा –
'बळी तो ________ पिळी.
(1) कान (2) नाक (3) मान (4) हात

75. 'देवा, मला चांगली बुद्धी दे.' या वाक्याचा प्रकार ओळखा.
(1) उद्गारार्थी (2) होकारार्थी (3) विध्यर्थी (4) आज्ञार्थी

76. 'मांजराच्या गळ्यात घंटा कोणी बांधायची?'
या म्हणीचा योग्य अर्थ लिहा -
(1) अडाणी लोकात अर्धवट शहाण्याला मोठेपण लाभते
(2) अवनती होऊ लागली म्हणजे सर्व बाजूनी होते
(3) धोक्याची कामे करायला कोणी पुढे येत नाही
(4) पैशाने सर्व कामे साध्य होतात

77. 'शरदाच्या चांदण्यात गुलमोहर मोहक दिसतो..' या वाक्यातील 'विधानपूरक' ओळखा –
(1) शरद (2) चांदणे (3) गुलमोहर (4) मोहक

78. वाक्य म्हणजे –
(1) अर्थहीन बोलणे (2) अर्थपूर्ण बोलणे (3) शब्दांचा समूह (4) अक्षरांचा समूह

79. अयोग्य पर्याय ओळखा.
(1) सूत (2) धागा (3) दोरा (4) सुत

80. 'विजा चमकू लागल्या आणि पावसाला सुरूवात झाली', या संयुक्त वाक्यातील अव्यय कोणते?
(1) विकल्पबोधक (2) परिणामबोधक (3) न्यूनत्वबोधक (4) समुच्चयबोधक

81. 'फरशीवरून चालत असताना पाय घसरून तो पडला.' वाक्यप्रकार ओळखा.
(1) विशेषणवाक्य (2) संयुक्तवाक्य (3) केवलवाक्य (4) मिश्रवाक्य

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

82. तीच तीच गाणी ऐकून माझे कान ________ .
वरील रिकामी जागा भरा.
(1) तुटले (2) किटले (3) टरकावले (4) रक्ताळले

83. 'दारोदार' हा कोणता समास आहे ?
(1) उपपद तत्पुरुष समास (2) कर्मधारय समास
(3) अव्ययी भाव समास (4) नञ तत्पुरुष समास

84. 'पांथस्थ आहे मी या जीवनाचा' या पंक्तीतील 'पांथस्थ' शब्दाचा अर्थ :
(1) पथारी (2) वाटसरु (3) तहानलेला (4) भुकेला

85. अनुस्वारापुढे पहिल्या पाच वर्ण वर्गातील व्यंजन आल्यास त्याचा उच्चार त्या व्यंजनाच्या वर्गातील ________ अनुनासिकासारखा होतो.
(1) पहिल्या (2) दुसऱ्या (3) शेवटच्या (4) तिसऱ्या

86. खालील वाक्यातील अधोरेखित शब्दांचे वाक्य पृथक्करणातील स्थान ओळखा –
'या कृत्याबद्दल आम्ही येथे जमलेले सर्व लोक आपले मन:पूर्वक अभिनंदन करितो.'
(1) उद्देश्य (2) उद्देश्यविस्तार (3) विधेय (4) कर्म

87. पुढीलपैकी तत्सम शब्द कोणते ?
(1) जल, ग्रंथ, परंतु (2) भाऊ, कोवळा, सासू
(3) दगड, धोंडा, डोके (4) पोट, चिमणी, रेडा

88. 'कसाई' हा शब्द कोणत्या भाषेतून मराठीत आलेला आहे ?
(1) अरबी (2) फार्सी (3) पोर्तुगीज (4) कन्नड

89. कोणतेही विशेषनाम ________ असते.
(1) अनेकवचनी (2) वचनहीन (3) एकवचनी (4) सामान्यनाम

90. 'माया' या शब्दाचे विविध अर्थ दर्शविणारे चारही अचूक शब्द कोणत्या पर्यायी उत्तरात आहेत.
(1) मोह, माया, क्रोध, प्रेम (2) पैसा, संपत्ती, धन, जमीन
(3) धन, संपत्ती, प्रेम, वात्सल्य (4) वात्सल्य, जिव्हाळा, मद, मत्सर

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**91.** निंदा करणाऱ्या माणसाचा आपल्याला फार उपयोग होतो म्हणूनच म्हणतात की ________ .

(1) नाक दाबले की तोंड उघडते (2) पालथ्या घागरीवर पाणी

(3) निंदकाचे घर असावे शेजारी (4) पुढच्यास ठेच मागचा शहाणा

---

**92.** 'त्याने आपले कर उंचावून सर्वांना अभिवादन केले' या वाक्यात विविध अर्थ असलेला खालीलपैकी पर्यायी शब्द कोणता ?

(1) त्याने (2) उंचावून (3) आपले (4) कर

---

**93.** 'मी <u>स्वत:</u> त्याला पाहिले,' या वाक्यातील अधोरेखित शब्द सर्वनामाच्या कोणत्या प्रकारातील आहे ?

(1) अनिश्चित (2) संबंधी (3) दर्शक (4) आत्मवाचक

---

**94.** खालील म्हणीच्या रिकाम्या जागी अचूक पर्याय लिहा.

'झाकली मूठ________ '.

(1) एक करोडची (2) सव्वा शेराची (3) सव्वा लाखाची (4) पाच बोटांची

---

**95.** खालील म्हणीच्या रिकाम्या जागी अचूक पर्याय भरा –

दिव्याखाली ________ .

(1) पतंग (2) ढेकूण (3) अंधार (4) उजेड

---

**96.** साठी, कारणे, करिता, अर्थी, प्रीत्यर्थ, निमित्त यापैकी शब्दयोगी अव्यये किती आहेत ?

(1) फक्त एक (2) फक्त तीन (3) सर्वच (4) यापैकी एकही नाही

---

**97.** साप माझ्या समोरुन गेला. या वाक्यातील 'समोरुन' शब्द ________ अव्यय आहे.

(1) स्थलवाचक क्रियाविशेषण (2) कालवाचक क्रियाविशेषण

(3) रीतिवाचक क्रियाविशेषण (4) आवृत्तिवाचक क्रियाविशेषण

---

**98.** खालीलपैकी 'गुळांबा' या शब्दाचा 'समास' ओळखा.

(1) कर्मधारय (2) तत्पुरुष (3) मध्यमपदलोपी (4) बहुव्रीही

---

**99.** '<u>त्याच्यासारखा दुसरा कोणीच नाही असा</u> तो योद्धा होता', या वाक्यातील अधोरेखित वाक्यखंडासाठी अचूक शब्द निवडा.

(1) सामान्य (2) अद्वितीय (3) बऱ्यापैकी (4) साधारण

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**100.** 'पोटात ठेवणे' या वाक्प्रचाराचा अर्थ __________ .
(1) आधार देणे (2) गुप्तता ठेवणे (3) पोटाशी धरणे (4) मौन धारण करणे

**101.** 'स्त्री' या शब्दाचा पर्यायवाची शब्द लिहा :
(1) विनिता (2) वनिता (3) माता (4) ममता

**102.** 'एके दिवशी युद्ध बंद झाल्याची बातमी येऊन थडकली,' या वाक्यातील विधेयविस्तार कोणते ?
(1) थडकली (2) युद्ध बंद झाल्याची
(3) बातमी (4) येऊन, एके दिवशी

**103.** 'अठरा गुणांचा खंडोबा' या वाक्प्रचाराचा योग्य अर्थ पुढील पर्यायातून शोधून काढा.
(1) दरिद्री माणूस (2) लबाड माणूस (3) सज्जन माणूस (4) साक्षर माणूस

**104.** 'गुरूजी म्हणाले, की पृथ्वी सूर्याभोवती फिरते', हे मिश्रवाक्य कोणत्या प्रकारचे आहे ?
(1) कारणबोधक (2) संकेतबोधक (3) स्वरुपबोधक (4) उद्देशबोधक

**105.** पुढीलपैकी अव्ययसाधित विशेषणाचे योग्य उदाहरण कोणते ?
(1) बोलकी बाहुली (2) पुढची गल्ली (3) कापड-दुकान (4) माझे-पुस्तक

**106.** पुढील नामाचा प्रकार ओळखा :
'चांगुलपणा'__________ .
(1) विशेषनाम (2) सामान्य नाम (3) भाववाचक नाम (4) सर्वनाम

**107.** 'कोबी' हा शब्द कोणत्या भाषेतून मराठीत आला ?
(1) हिंदी (2) कानडी (3) पोर्तुगीज (4) इंग्रजी

**108.** 'आम्ही जातो आमुच्या गावा.' या वाक्यात विधेय कोणते आहे ?
(1) गावा (2) आमुच्या (3) आम्ही (4) जातो

**109.** 'आमचे शरीर सुदृढ व्हावे. आम्ही योगासने करतो', या वाक्यांचे मिश्रवाक्य करण्यासाठी कोणते अव्यय वापरावे लागेल ?
(1) म्हणून (2) की (3) म्हणजे (4) पण

**110.** 'तो शाळेत पायी गेला' या वाक्यातील अधोरेखित शब्दाच्या विभक्तीचा कारकार्थ ओळखा.
(1) कर्ता (2) अपादान (3) करण (4) अधिकरण

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**पुढील उतारा वाचून त्या खालील प्रश्न क्र. 111 ते 115 ची उत्तरे निवडा.**

पावसाळा संपतो आणि निसर्ग हिरव्या रंगाची मुक्त उधळण करत येतो. सरोवरे, शेते, नद्या, नाले या ठिकाणी हिरव्या रंगाचे जणू मुक्त प्रदर्शन भरते. हिरव्या रंगाची विशाल वस्त्रे परिधान करून उभे असलेले गिरिराज, त्याचप्रमाणे हिरवा शालू नेसलेली शेते आणि त्यांच्या कडेला फुललेली तरड, तेरडा, तीळ, झेंडू यांची पिवळी फुले म्हणजे हिरव्या साडीची पिवळी किनारच जणू! सरोवरातील विविध रंगी कमळे पाहून मन आनंदाने तृप्त होऊन जाते. कमळाच्या वर्तुळाकार पानांनी भरलेली सरोवरे पाहिली की, असे वाटते या निसर्गसुंदरीच्या कपाळावर कुणीतरी हिरवी टिकली गोंदली आहे. जास्वंदीच्या झाडातून डोकावून पाहणारी तिची लाल फुले पाहून वाटते, लाल तुऱ्याचा हा कोंबडा जणू पहाटेची बांग देत आहे. झऱ्याच्या झुळूझुळू वाहणाऱ्या पाण्याचा आवाज ऐकून वाटते, वनराणी जणू पायात चाळ घालून नृत्य करत आहे. तुरे नाचवणारी लिलीची पांढरी शुभ्र फुले पाण्याच्या कारंजांची आठवण करून देतात. उद्यानातील मोगरा, जाई, जुई इत्यादींच्या फुलवेलींवरील फुले पाहून सुंदर ललना टपोरी फुले केसात माळून नटल्या आहेत असे वाटते. असा हा निसर्गसौंदर्याचा उत्तम आविष्कार पाहून डोळ्यांचे पारणे फिटते.

---

**111.** निसर्गसुंदरीच्या कपाळावरील हिरवी टिकली कोणती ?

(1) पांढरी शुभ्र फुले (2) सरोवरे (3) शेते (4) नद्या

---

**112.** हिरव्या रंगाची विशाल वस्त्रे कोण नेसतात ?

(1) ललना (2) पशुपक्षी (3) गिरीराज (4) सरोवरे

---

**113.** हिरव्या रंगाचे मुक्त प्रदर्शन कधी भरते ?

(1) पावसाळयाच्या सुरुवातीला (2) हिवाळा संपतो तेव्हा
(3) उन्हाळयाच्या सुरुवातीला (4) पावसाळा संपतो तेव्हा

---

**114.** लाल तुऱ्याचा कोंबडा कोणास म्हटले आहे ?

(1) लिलीच्या फुलांना (2) झेंडूच्या फुलांना
(3) जास्वंदीच्या फुलांना (4) कमळाच्या फुलांना

---

**115.** तुरे नाचविणारी फुले कोणती ?

(1) झेंडूची पिवळी फुले (2) लिलीची पांढरी शुभ्र फुले
(3) तेरड्याची फुले (4) तिळाची फुले

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**पुढील उतारा वाचून त्या खालील प्रश्न क्र. 116 ते 120 ची उत्तरे लिहा.**

शहरांत राहावयाला आलो, तरी निसर्गाची संगत मी सोडलेली नाही. मुंबईत समुद्र हा माझा सोबती आहे. त्याच्या लाटांची अहोरात्र चाललेली मर्मर हे माझ्या जीवनातले पार्श्वसंगीत आहे. भरतीच्या आणि ओहोटीच्या तालावर माझ्या मनोवृत्ती अक्षय नाचत असतात. किनाऱ्यावरच्या उंच-उंच माडांच्या नि नारळींच्या झाडांप्रमाणे मीही वाऱ्याच्या सोसाट्यामध्ये धुंद होऊन अष्टौप्रहर डोलत असतो. पहाटेच्या वेळी अंगावर लाटांचे तुषार झेलीत ओल्या आणि भुसभुशीत वाळूवर अनवाणी पावलांनी चालण्यात केवढे काव्य आहे? पण पुष्कळ लोक पायांत बूट घालून अन् सारे अंग लोकरी कपड्यांत पॅकबंद करून समुद्रावर हिंडायला येतात. मी त्यांना म्हणतो, "अरे, परमेश्वराचे तीर्थ उडू द्या थोडे अंगावर. त्याचा श्वास शिरू द्या तुमच्या नाकातोंडात. निसर्गाच्या देवळांतही बाहेर जोडे ठेवून शिरायचे असते।" पण कोण ऐकतोय? निसर्गाला कोणी संधीच देत नाही. समुद्र म्हणजे त्यांना शत्रू वाटतो. अंगात 'चिलखते' घालून त्याला भेटायला येतात. मुंबईच्या सागराप्रमाणे खंडाळ्याचा डोंगरही माझा मित्र आहे. मी बारक्यासारक्या लोकांशी मैत्री करीतच नाही. या डोंगरावर माझे एक घर आहे. पुष्कळदा मी तिथे राहतो. माझे सारे लेखन मी तिथेच करतो. मला काही 'योग' येत नाही, पण खंडाळ्याला गेलो की ताबडतोब माझी 'समाधी' लागते. माणसांचे जग मी पार विसरून जातो. उंच-उंच डोंगरावर निळेभोर आभाळ बसलेले असते. तास न् तास मी त्याच्याशी गोष्टी करीत असतो. आभाळाच्या कापसांत बुबुळे गुंडाळून ठेवली म्हणजे उघड्या डोळ्यांनी झोपल्यासारखे वाटते. झाडाझुडपांच्या आणि झऱ्यांच्या संगतीत दिवस कसा निघून जातो हे कळत नाही.

---

**116.** शहरात राहायला येऊनही लेखकाने कोणाची संगत सोडलेली नाही?

(1) मित्रांची (2) निसर्गाची (3) शत्रूंची (4) लहानमुलांची

---

**117.** समुद्रकिनाऱ्यावर लेखक कोणाप्रमाणे डोलत असतो?

(1) नागाप्रमाणे (2) मुलांप्रमाणे

(3) माड आणि नारळीच्या झाडांप्रमाणे (4) गारूडया प्रमाणे

---

**118.** मुंबईत लेखकाचा सोबती कोण आहे?

(1) मित्र (2) समुद्र (3) तीर्थक्षेत्र (4) डोंगर

---

**119.** लेखकाचा कोणाच्या संगतीत कसा दिवस निघून जातो हे कळत नाही?

(1) झाडेझुडपे आणि झरे (2) शत्रु

(3) आळशी मित्र (4) टवाळखोरात

---

**120.** लेखकाच्या जीवनातील पार्श्वसंगीत कोणते?

(1) वादळी पाऊस (2) लाटांची मर्मर

(3) देऊळातील शांतता (4) लोकरी कापडाची चिरचिर

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**खालील उताऱ्यातील प्रश्न क्र. 121 ते 125 ची उत्तरे द्या.**

'सत्य' आणि 'अहिंसा' या दोन मूल्यांचा गांधीजींनी सातत्याने पुरस्कार केला. भित्रा माणूस कधीही सत्यवादी असू शकत नाही. निर्भय बनण्यासाठी सत्यनिष्ठ बनले पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता, पं. नेहरू त्यांच्याविषयी लिहितात, 'गांधीजींच्या इतका सत्यनिष्ठ पुरूष मला तरी माहीत नाही. राजकारणी मनुष्यात इतकी सत्यनिष्ठा असणे म्हणजे हा धोक्याचा सद्‌गुण होय; कारण असा पुरुष स्वत:चे मत बोलून दाखवितो आणि मनातील फेरबदल, मनातील घडामोडी तो लोकांसमोर इतक्या उघड्या करून ठेवतो की त्यांनी पहावे.' अहिंसेची व्याख्या गांधीजींनी फार व्यापक केलेली आहे. अन्यायाला प्रतिकार अहिंसेने करणे हे केव्हाही श्रेष्ठ, असे ते मानत होते. परंतु भीतीमुळे अन्याय सहन करण्यापेक्षा हिंसेने उत्तर दिले तर योग्य ठरेल अशी त्यांची भूमिका होती. 'भीती व हिंसा असे दोनच पर्याय उपलब्ध असतील तर मी हिंसेच्या बाजूचा आहे.' असे गांधी म्हणत असत. त्यांना बलवानाची अहिंसा अभिप्रेत होती. गांधीजींचा साधन शुचितेवर भर होता, आणि म्हणूनच स्वातंत्र्यलढ्यामध्ये अहिंसात्मक मार्गांचा अवलंब करीत असताना हिंसेचे गालबोट लागू नये असा त्यांचा कटाक्ष होता.

गांधीजींचे सारे तत्त्वज्ञान मानवाच्या कल्याणाचा विचार करणारे आहे, 'आदर्श भारता' विषयी आपले मनोगत व्यक्त करताना गांधीजी लिहितात 'हा देश आपला आहे असे जेथे त्यांना वाटेल, जेथे वरिष्ठ व कनिष्ठ असे वर्गभेद लोकांत मुळीच नाहीत, जेथे सर्व जमाती सलोख्याने एकजीव नांदत आहेत ... ह्याभारतात अस्पृश्यता, मादक पेये व अमली पदार्थ ह्या उपाधींना जागाच नाही... स्त्रियांना पुरुषांचे सारे हक्क असतील ..... असा भारत देश असावा असे माझे मनोराज्य आहे.'

---

**121.** 'आदर्श भारता' विषयी म. गांधीजींचे मनोगत कोणते ?

(1) वरिष्ठ-कनिष्ठ वर्गभेद असणे. (2) जमातीत वितुष्ट

(3) अंमली पदार्थांना प्राधान्य (4) स्त्रियांना पुरुषांचे सारे हक्क

---

**122.** अन्यायाचा प्रतिकार कसा करावा ?

(1) कलह करून (2) अहिंसा वृत्तीने (3) तंटा करून (4) हिंसा करून

---

**123.** म. गांधीजींचे तत्त्वज्ञान कोणता विचार करते ?

(1) हिंसा वृत्ती (2) भ्याड प्रवृत्ती (3) अराजक प्रवृत्ती (4) मानवी कल्याण

---

**124.** निर्भय बनण्यासाठी कसे बनले पाहिजे ?

(1) सत्यनिष्ठ (2) अक्रिय (3) दांडगट (4) हिंसक

---

**125.** कोणता मनुष्य सत्यवादी असू शकत नाही ?

(1) स्वार्थी (2) दाष्ट (3) भित्रा (4) ढोंगी

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**खालील उतारा वाचून प्रश्न क्र. 126 ते 130 या प्रश्नांची उत्तरे द्या.**

आकाश निरभ्र होते. सूर्यबिंब लाल झाले होते ; पण ती पराक्रमाची लाली वाटत नव्हती. श्रेष्ठ व महान पुरुष आपत्काळीसुद्धा विलक्षण धैर्याने वागतो त्या वेळी त्याच्या मुखावर जी एक अपूर्व शोभा झळकत असते, तशीच ही शोभा वाटत होती. क्षणभरसुद्धा विसावा न घेता, कसल्याही फळाची आकांक्षा न धरता, जगाची एवढी सेवा करणारा हा कर्मवीर जगातील कृतघ्नतेच्या जाणिवेमुळे जणू काही कष्टी झाला आहे, असे वाटत होते. जगाचा कानाकोपरा आपल्या प्रकाशाने उजळणारा, अनंत जिवांना प्रेरणा नव्हे, जीवनसत्त्वे देणारा प्रवासी एक मुक्काम करून दुसऱ्या मुक्कामाकडे जायला निघाला होता. एखाद्या वर्तमानपत्राचा बातमीदार बातम्या देण्यासाठी घाईघाईने आपल्या कार्यालयाकडे धावपळ करीत जाताना दिसतो, त्याप्रमाणे जगातील सर्व घडामोडींचा साक्षीदार जगाचे इतिवृत्त विश्वनिर्मात्याकडे रुजू करण्यासाठी जात असावा. त्याने काय पाहिले असेल, याची संपूर्ण कल्पना कुणालाही येऊ शकत नाही. मनुष्य जे जे काही करीत असतो, त्याचे साक्षीदार सृष्टीतील प्रभावी द्रव्ये असतात. चंद्र, सूर्य आणि ही भूमी ह्या सर्वांना मनुष्य शरीराने जे करतो आणि मनाने जे चिंतितो ते सारे अवगत असते, असे धर्मशास्त्र सांगते. हे खरे असेल काय ? आणि तसे असेल तर' माझ्या मनातले विचार हा सूर्यनारायण खास जाणीत असला पाहिजे.

---

**126.** या उताऱ्यातील वर्णन कोणत्या वेळचे आहे ?

(1) सकाळच्या (2) दुपारच्या (3) संध्याकाळच्या (4) रात्रीच्या

---

**127.** या उताऱ्यावरून सूर्याचा कोणता विशेष गुण दिसून येतो ?

(1) विसावा घेणे (2) धावपळ न करणे (3) एकाच मुक्कामी थांबणे (4) निरपेक्षता

---

**128.** 'निरभ्र' म्हणजे काय ?

(1) ढगांनी व्यापलेले (2) स्वच्छ (3) ढगाळलेले (4) काळेकुट्ट

---

**129.** हा कर्मवीर कशामुळे व्यथित झाला असावा ?

(1) दीर्घ प्रवासामुळे (2) लोकांकडे कृतज्ञता नसल्यामुळे

(3) घाईघाईने काम करावे लागल्यामुळे (4) सतत जगाची सेवा करावी लागते म्हणून

---

**130.** खालीलपैकी कोणता शब्द 'सूर्य' या शब्दाचा समानार्थी शब्द नाही ?

(1) मार्तंड (2) दिनकर (3) सविता (4) रत्नाकर

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

